**यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ**
**अंतर्गत विभागीय कार्यालय व उपविभागीय**
**कार्यालयाचे मुख्यालय स्थानांतर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांकः मुअस्था-२०१०/३५२३९/(११०/२०१०) मोप्र-२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांकः- २०.०४.२०१०

**प्रस्तावना :-** मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग अमरावती यांचे प्रादेशिक विभागांतर्गत अधिक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे मंडळ यवतमाळ यांच्या अधिपत्त्याखालील १) निम्न पैनगंगा पुनर्वसन विभाग, पुसद २) निम्न पैनगंगा पुनर्वसन उपविभाग क्रमांक १, यवतमाळ, ३) निम्न पैनगंगा प्रकल्प विभाग, यवतमाळ अंतर्गत निम्न पैनगंगा प्रकल्प उपविभाग क्रमांक ४, दिग्रस या कार्यालयाचे मुख्यालय आर्णी येथे स्थानातंर करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

प्रस्तावनेत नमुद केल्यानुसार कार्यकारी संचालक विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांच्या दिनांक ८/१/२०१० च्या प्रस्तावानुसार यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ अंतर्गत विभागीय कार्यालय व उपविभागीय कार्यालयाचे मुख्यालय स्थानातंर करणेबाबत खालीलप्रमाणे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **कार्यालयाचे नाव व मुख्यालय** | **कार्यालयाचे नवीन मुख्यालय** | **मुख्यालय बदलण्याबाबतची कारणमिमांसा** |
|---|---|---|---|
| १ | निम्न पैनगंगा पुनर्वसन विभाग, पुसद (विभागीय कार्यालय) | आर्णी | निम्न पैनगंगा प्रकल्पातंर्गत पुनर्वसन करावयाची यवतमाळ जिल्हयातील ३४ गांवे व नांदेड जिल्हयातील १२ गांवे आर्णी या मुख्यालयापासुन पुसद या सध्याच्या मुख्यालयापेक्षा जवळपास ५० कि.मी. अंतरावर असल्यामुळे व यवतमाळ व नांदेड जिल्हा मुख्यालय आर्णी वरुन पुसद पेक्षा जवळ असल्यामुळे कामें सुलभतेने होणेचे दृष्टीने स्थानांतर करण्यात येत आहे. |
| २ | निम्न पैनगंगा पुनर्वसन विभाग, पुसद अंतर्गत निम्न पैनगंगा पुनर्वसन उपविभाग क्र. १ यवतमाळ | आर्णी | निम्न पैनगंगा प्रकल्पातंर्गत पुनर्वसन करावयाची यवतमाळ जिल्हयातील ३४ गांवे व नांदेड जिल्हयातील १२ गांवे आर्णी या मुख्यालयापासुन यवतमाळ हया सध्याच्या मुख्यालयापेक्षा जवळपास ५० कि.मी. अंतरावर असल्यामुळे व यवतमाळ व नांदेड जिल्हा मुख्यालय आर्णी वरुन यवतमाळ पेक्षा जवळ असल्यामुळे कामें सुलभतेने होणेचे दृष्टीने स्थानांतर करण्यात येत आहे. |
| ३ | निम्न पैनगंगा प्रकल्प विभाग, यवतमाळ अंतर्गत निम्न पैनगंगा प्रकल्प उपविभाग क्र. ४ दिग्रस | आर्णी | निम्न पैनगंगा प्रकल्पाची कामे दिग्रस हया मुख्यालयापेक्षा आर्णी हया मुख्यालयापासुन जवळ असल्यामुळे हे मुख्यालय दिग्रस वरुन आर्णी येथे स्थानांतरीत करण्यात येत आहे. |

सदर कार्यालय स्थानांतरणामुळे शासनाच्या दायीत्वामध्ये वाढ होणार नाही, या अटीच्या अधीन राहून सदर स्थानांतरणास मान्यता देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय वित्त विभाग क्र. १०९२/सीआर/८०६/व्यय-६, दि. १५.१०.१९९२ अन्वये जलसंपदा विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००४२०१८४८२०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(मु.कि.वैरागडे)
शासनाचे उप सचिव

प्रतः-

स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (म.कृ.खो.वि.म. वगळून), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपुर
महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपुर
संचालक, लेखा व कोषागारे ,महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व महामंडळे (५) जलसंपदा विभाग ,महाराष्ट्र राज्य
सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
सर्व अधीक्षक अभियंता (क्षेत्रिय स्तर), जलसंपदा विभाग
यांना असे कळविण्यात येते की, त्यांनी आपल्या अधिपत्याखालील सर्व कार्यकारी अभियंता व उप विभागीय अभियंता यांच्या निदर्शनास प्रस्तुत शासन निर्णय आणावा.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती
अधिक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ
जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ, महाराष्ट्र राज्य
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन मुंबई (२ प्रती)
सर्व अधिकारी व कार्यासने (तांत्रिक), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
कार्यासन मोप्र-२ (संग्रहार्थ)